**मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण तसेच मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात विविध न्यायालयीन प्रकरणामध्ये प्राप्त होणा-या आदेश तसेच नोटिशी वर तात्काळ कार्यवाही करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१६/प्र. क्र.१८/विधी**

गो.ते. रुग्णालय, इमारत संकुल, दहावा मजला,
मंत्रालय, मुंबई- ०१
तारीख: ३० नोव्हेंबर, २०१६

**वाचा :-**

**१) शासन परिपत्रक क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग, परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१६ प्र.क्र.१४/ विधी, दि. २३ ऑगस्ट, २०१६**

**शासन परिपत्रक :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील निरनिराळया कार्यालयांमध्ये मोठया प्रमाणात अधिकारी/कर्मचारी कार्यरत आहेत. या अधिकारी/कर्मचा-यांच्या सेवाविषयक बाबींची प्रकरणे मोठया प्रमाणात सार्वजनिक आरोग्य विभागाकडे शासन आदेशार्थ/निर्णयार्थ पाठविण्यात येतात. त्यास अनुसरुन अशा अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबींच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे अनेक अर्ज दाखल होत असतात व त्यामध्ये सार्वजनिक आरोग्य विभागास प्रतिवादी करण्यात येते. अशा प्रकरणांमध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या प्रत्येक आदेशाबाबत विधि व न्याय विभागाच्या अभिप्रायानुसार सदर आदेशावर अपील दाखल करण्याची आवश्यकता असल्याचा किंवा नसल्याचा निर्णय घेऊन सदर आदेशाची अंमलबजावणी करणे आवश्यक ठरते. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या आदेशाची विहित कालावधीत पूर्तता न झाल्यास, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणासमोर अवमान याचिका दाखल होण्याचे प्रसंग उद्भवतात, ही बाब निश्चितपणे उचित ठरत नाही. असे प्रसंग भविष्यात उद्भवू

नयेत म्हणून वरील वाचा येथील परिपत्रक अधिक्रमित करण्यात येत असून या संदर्भात पुढीलप्रमाणे नव्याने सूचना देण्यात येत आहेत :-

१) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेले आदेश विभागात प्राप्त झाल्यानंतर, नोंदणी शाखेने ते आदेश तात्काळ संबंधित सह सचिव / उप सचिव यांच्या निदर्शनास आणावेत.

२) संबंधित सह सचिव/उप सचिव यांना मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या, तसेच अर्जदारांच्या विधिज्ञांनी दिलेल्या नोटीसा त्याच दिवशी व मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात दाखल केलेले मूळ अर्ज दोन दिवसात प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य व कुटुंबकल्याण) यांच्या निदर्शनास आणावेत.

३) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशांची पूर्तता विहित कालावधीत करण्यास विलंब झालेल्या अथवा पूर्तता न झालेल्या अशा बाबीही प्रधान सचिव (सा.आ.व कु.क.) यांच्या निदर्शनास आणाव्यात.

४) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशांची पूर्तता विहित कालावधीत होण्याच्या दृष्टीने देखरेख करण्याकरिता संबंधित कार्यासनाचे सह सचिव/उप सचिव यांना जबाबदार अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

५) सार्वजनिक आरोग्य विभागातील वैद्यकिय अधिकारी, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ तसेच गट "अ" व "ब" या वरिष्ठ स्तरावरील अधिकारी यांच्याबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाडून प्राप्त होणा-या प्रकरणात प्रधान सचिव (सा.आ.व कु.क) हे अंतिम प्राधिकारी राहतील. त्याचप्रमाणे वैद्यकिय अधिकारी (गट-ब) व त्या खालील स्तरावरील प्रकरणाबाबत संचालक, आरोग्य सेवा व आयुक्त, राज्य कामगार विमा योजना हे सक्षम प्राधिकारी व अंतिम उत्तरदायित्व असलेले प्राधिकारी राहतील. मात्र प्रकरण परत्वे आवश्यकतेनुसार सदरील संवर्गातील कर्मचाऱ्यांची प्रकरणे प्रधान सचिव (सा.आ.) यांना दाखवून अंतिम करण्यात यावीत. संबंधीतानी या परिपत्रकातील सूचना व मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक राहील.

६) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशाची छाननी करुन त्यावर विधि व न्याय विभागाच्या अभिप्रायानंतर अपील दाखल करणे अथवा आदेशांची अंमलबजावणी करणे या बाबत तात्काळ कार्यवाही करणेत यावी. जर न्यायालयीन प्रकरणात/मूळ अर्जात (O.A.) अन्य विभागाला प्रतिवादी म्हणून दाखविणे आवश्यक असल्यास पुनरावलोकन अर्ज (Review Petition) दाखल करुन त्याबाबत कार्यवाही करावी.

७) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणांची प्रकरणे हाताळताना आदेशांची पूर्तता करण्याच्या दृष्टीने संबंधित कार्यासनाने त्या प्रकरणांची विनाविलंब छाननी करुन

जास्तीत जास्त दुस-या दिवसापर्यंत, गट अ तसेच गट ब व क च्या बाबतीत, प्रधान सचिव (सा.आ.व कु.क) यांना अहवाल सादर करुन प्रकरणातील निकड त्यांच्या निदर्शनास आणावी.

८) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशाची पूर्तता करण्यास अधिक कालावधी लागणार असल्यास त्या कारणांची नोंद करुन तसेच सदर प्रकरणातील आदेशाच्या अंमलबजावणीसाठी लागणाऱ्या अवधीची व प्रकरण सध्या कोणत्या स्तरावर, व कशासाठी प्रलंबित आहे, अशा संपूर्ण तपशिलासह मुख्य सादरकर्ता अधिकारी यांच्या मार्फत मा. महाराष्ट्र प्रशसकिय न्यायाधिकरण यांना संबंधीत प्रकरणात आदेशाच्या अंमलबजावणीस मुदत वाढ मिळण्याकरीता विनंती अर्ज सादर करावा.

९) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार करण्यात येत असलेल्या कार्यवाहीबाबत तसेच विलंब होत असल्यास विलंबाबाबत वेळोवेळी इतर संबंधित कार्यालयास तसेच अपीलकर्त्यास तपशिलासह अवगत करण्यात यावे.

१०) मा. न्यायाधिकरणाची प्रकरणे हाताळताना अधिक काळजी घेण्याच्या दृष्टीने प्रत्येक कार्यासनाने या प्रकरणासाठी स्वतंत्र नोंदवही ठेवणेबाबत मा. न्यायाधिकरणाने मार्गदर्शन केले आहे. विभागातील संबंधित अधिकाऱ्यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशाची पूर्तता करण्याच्या दृष्टीने संबंधित प्रकरणाची तात्काळ छाननी करुन प्रकरणाची टिपणी शिफारशींसह सादर करावी.

११) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशाची पूर्तता करण्याकरिता क्षेत्रीय कार्यालयाकडून माहिती/प्रस्ताव आवश्यक असल्यास, अशी माहिती/प्रस्ताव कालमर्यादेत प्राप्त करुन घ्यावी. तसेच, सदर माहिती / प्रस्ताव मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशाची पूर्तता विहित कालावधीत करण्याकरीता आवश्यक असल्याचे क्षेत्रीय कार्यालयाच्या स्पष्टपणे निदर्शनास आणावे, व जोपर्यंत न्यायालयीन प्रकरणाबाबत योग्य ती कार्यवाही पूर्ण होत नाही तोपर्यंत न्यायालयीन प्रकरण हाताळण्यास जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्याने/कर्मचाऱ्याने कार्यालय सोडू नये.

१२) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय कार्यालयांशी संबंधित कामगार/दिवाणी/औद्योगिक न्यायालये/महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/मा.उच्च न्यायालय तसेच मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असणा-या न्यायालयीन प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी संचालनालयाच्या परिमंडळ स्तरावर, गट अ, ब व क च्या बाबतीत उपसंचालक, आरोग्य सेवा व त्याखालील कर्मचा-यांच्या बाबतीत संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात यावी. अशाच प्रकारे आयुक्त, राज्य कामगार विमा योजना यांचे कार्यालयात वैद्यकीय अधिक्षक यांचे अध्यक्षतेखालील त्यांचे कार्यालयाशी संबंधित सर्व संवर्गातील कर्मचाऱ्यांचेबाबतीत न्यायालयीन प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी समिती गठीत करावी. संबंधित उपसंचालक,

आरोग्य सेवा, जिल्हा आरोग्य अधिकारी व वैद्यकिय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना, मुख्यालय यांनी सदरहू न्यायालयीन प्रकरणात दर १५ दिवसांनी नियमित आढावा घ्यावा. अशी प्रकरणे निकाली काढण्याकरिता संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा/जिल्हा आरोग्य अधिकारी/वैद्यकीय अधिक्षक राकावियो मुख्यालय हे जबाबदार राहतील.

१३) न्यायालयीन प्रकरणी अन्य मंत्रालयीन विभागाचे अभिप्राय घेणे नियमानुसार बंधनकारक असल्यास, संबंधित नस्ती प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांच्या मान्यतेने त्या विभागाकडे अनौपचारिक संदर्भाव्दारे तात्काळ सादर करावी. मा. न्यायाधिकरणाच्या आदेशाची पूर्तता करणे बंधनकारक असल्याचे संबंधित विभागाच्या निदर्शनास आणावे. त्यामध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकरणाच्या आदेशाचा संदर्भ देऊन सदर आदेशाची पूर्तता विहित कालावधीत करण्याकरिता कालमर्यादेत अभिप्राय देण्याची विनंती त्या विभागास करावी. तसेच, न्यायालयीन प्रकरणांचा पाठपुरावा करून अन्य विभागांचे अभिप्राय प्राप्त करून घ्यावेत. इतर विभागाचे अभिप्राय घेणे नियमानुसार बंधनकारक असल्याचे अर्जदारास तात्काळ कळवावे.

१४) एखादया न्यायालयीन प्रकरणात शासनमान्यता आवश्यक असल्यास अशी प्रकरणे विनाविलंब शासन मान्यतेस्तव सादर करून मान्यता प्राप्त झाल्यानंतर त्याबाबतचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत व आदेशाची पूर्तता करण्यात आल्याचे, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकारणाच्या व अर्जदाराच्या निदर्शनास आणण्याची विनंती, मुख्य सादरकर्ता अधिकारी यांना करावी.

१५) वरीलप्रमाणे कार्यवाही केली जात नसल्याने मा. न्यायधिकारणाच्या आदेशाचे विहित कालमर्यादेत पालन करण्याची कार्यवाही कालमर्यादेत होत नाही त्यामुळे अर्जदार/याचिका कर्ता यांचेकडून मा. न्यायायलयात/प्राधिकरणात अवमान अर्ज दाखल होवून अवमान नोटीसा प्राप्त होतात. अशा प्रकरणातील नोटीसांना तात्काळ उत्तरे देण्यात यावीत, मा. न्यायधिकारणाच्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरिता काय कार्यवाही करण्यात आली /येत आहे अथवा अपील दाखल करण्याची कार्यवाही सुरू आहे याबाबत उपरोक्त उत्तरात स्वयंस्पष्ट माहिती व वस्तुस्थिती अर्जदारास कळविण्यात यावी, व तत्सबंधी विधी कक्षासही अवगत करण्यात यावे.

१६) सदरील कार्यपध्दतीचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन केले नसल्याचे निदर्शनास आल्यास याबाबत गंभीर दखल घेऊन संबंधितांवर शिस्तभंगाची कारवाई केली जाईल याची सर्व संबंधीतांनी नोंद घ्यावी. मा. न्यायालयाने आर्थिक स्वरुपाचा दंड/शास्ती लादल्यास संबधित जबाबदार अधिकाऱ्याकडून /कर्मचाऱ्याकडून सदर दंड/शास्ती वसूल केली जाईल. ही बाब आपल्या विशेषत: निदर्शनास आणण्यात येत आहे.

वरील परिपत्रक हे सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, (खुद्द) तसेच विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय कार्यालयांना लागू होतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०६११५१५१६०१७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tatoba Maruti Kolekar

Digitally signed by Tatoba Maruti Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=Tatoba Maruti Kolekar
Date: 2016.12.06 14:36:36 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ( सर्व )
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ) मुंबई
५. उपसंचालक आरोग्य सेवा ( सर्व )
६. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
८. प्रधान सचिव ( सा.आ.), यांचे स्वीय सहायक
९. सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती